शासनाच्या अनिवासी (कार्यालयीन) व निवासी इमारतींच्या परिणामकारक देखभाल दुरुस्तीबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१२३/इमा-३
## मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
## दिनांक :- ६ ऑक्टोबर २०१८

**प्रस्तावना -**

शासनाच्या विविध विभागांच्या कार्यालयीन व निवासी इमारतींची देखभाल दुरुस्ती सा.बां.विभागामार्फत करण्यात येते. विविध विभागांच्या सर्व इमारतींचे प्रमाण, जिल्हा मुख्यालयांपेक्षा सा.बां.प्रा.वि.च्या मुख्यालयी जास्त आहे. ६ प्रादेशिक विभागाच्या मुख्यालयांपैकी, मुंबई हे राज्याच्या राजधानीचे ठिकाण असल्याने, मुंबईतील कार्यालयीन (अनिवासी) व निवासी इमारतींचे प्रमाण लक्षणीय आहे.

राज्यातील अशा सर्व प्रादेशिक, जिल्हा व तालुका मुख्यालयातील इमारतींच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीच्या माध्यमातून त्यांचे जतन साध्य होण्याकरिता शासकीय इमारतींच्या दुरुस्तीची Inventory अद्ययावत असणे, त्यांचे प्राधान्य निश्चित करणे, त्यानुसार नियोजन व कार्यान्वयन करुन उपलब्ध निधीमध्ये आवश्यक व अपेक्षित दर्जाचे काम नियोजित वेळेत पूर्ण करणे याकरिता सा.बां.विभागाच्या अधिकाऱ्यांचे व्यवस्थापन परिपूर्ण व कार्यक्षम असणे ही बाब गरजेची आहे. अस्तित्वातील इमारतींचे जतन करण्यासाठी त्यांची देखभाल व दुरुस्ती करणे ही सा.बां.विभागाची मूलभूत जबाबदारी आहे.

**परिपत्रक -**

राज्यातील सर्व प्रादेशिक, जिल्हा व तालुका मुख्यालयातील इमारतींच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीच्या माध्यमातून त्यांचे जतन साध्य करण्याकरीता खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) मुख्य अभियंता ते उपअभियंता यांनी अस्तित्वातील इमारतींच्या देखभाल दुरुस्तीबाबत करावयाच्या पाहणी बाबत इमारतीच्या क्षेत्रफळ निहाय मार्गदर्शक सूचना शासन परिपत्रक क्र.बी.डी.जी.१०९०/सी.आर.-२४/इमारत-२/१९९० दि.३१.०३.१९९० अन्वये विस्तृतपणे निर्गमित करण्यात आल्या आहेत. (परिपत्रक Mahapwd website वर उपलब्ध आहे)

या अनुषंगाने **प्रत्येक महिन्याच्या पहिल्या, तिसऱ्या व पाचव्या शनिवारी कार्यकारी अभियंता, उप अभियंता व संबंधित शाखा अभियंता यांनी त्यांच्या अखत्यारीतील कार्यालयीन व निवासी इमारतींची पाहणी करावी.** याप्रमाणे शाखा अभियंता यांनी त्यांच्या अखत्यारीतील इमारती महिन्यातून २ वेळा, उपअभियंता यांनी १ वेळा व कार्यकारी अभियंता यांनी २०% इमारतींची तपासणी करावी. मोठया प्रशासकीय इमारतीची मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांनी पाहणी करावी. संबंधित देखभाल दुरुस्ती सेवा केंद्रात आलेल्या तक्रारींच्या अनुषंगाने तसेच इतर दुरुस्त्या उद्भवल्या असल्यास/ उद्भवणार असल्यास त्यांची नोंद घ्यावी.

२) त्यानंतर प्रत्येक स्तराच्या अभियंत्याने त्यांच्या लगतच्या वरीष्ठ अधिकाऱ्यास लगतच्या पुढच्या सोमवारी प्रत्यक्ष भेटून अहवाल सादर करावा.

३) वरीलप्रमाणे प्राप्त तक्रारी व निदर्शनास आलेल्या दुरुस्त्यांचे निराकरण करण्यास अंमलबजावणीचे नियोजन करुन उपलब्ध निधीनुसार (Job No. अंदाजपत्रके, निविदा प्रक्रिया इत्यादी) किमान वेळेत प्राधान्य क्रमानुसार दुरुस्त्यांची कामे अपेक्षित दर्जाची करावीत.

४) देखभाल दुरुस्तीच्या सेवा केंद्रात प्राप्त होणाऱ्या तक्रारीमध्ये विद्युत बाबींविषयी तक्रारींचा सुध्दा अंतर्भाव असावा व संबंधित गाळेधारक अधिकाऱ्यांना विद्युत शाखेशी संपर्क साधण्यास न सांगता, सदर इमारतीशी संबंधित शाखा अभियंता/उप अभियंता यांनी विद्युत शाखेस कळवून तात्काळ निराकरण करण्यास सांगावे व अनुपालनाचे संनियंत्रण करावे.

५) खुद्द गाळयातील अथवा संपूर्ण इमारतीतील दुरुस्त्यांव्यतिरिक्त, सदर इमारतीच्या परिसरातील विद्युत मांडणी, परिसराचे पुरेसे अपेक्षित प्रकाशीकरण परिपूर्णतेने कार्यरत राहील याची खातरजमा कार्यकारी अभियंता करीत असल्याची खात्री अधीक्षक अभियंता (विद्युत) यांनी करावी व मुख्य अभियंता (विद्युत) यांनी त्यावर संनियंत्रण ठेवावे. निवासांच्या स्थापत्य दुरुस्तींच्या निराकरणाची खातरजमा अधीक्षक अभियंता यांनी करावी व मुख्य अभियंता यांनी त्यावर संनियंत्रण ठेवावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१०१७१२२०५१२८१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sachin Manikrao Chivate

Digitally signed by Sachin Manikrao Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, serialNumber=40ae84322c80d3e4ea1b574eb3782ed6cb133b938933bdf197ed5a1551d8622a, cn=Sachin Manikrao Chivate
Date: 2018.10.17 12:23:54 +05'30'

**( सचिन चिवटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग सर्व
२. अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ सर्व
३. कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग सर्व